**मे. परिवर्तन बेरोजगार सेवा सहकारी संस्था मर्यादित यांच्या कंत्राटी स्वच्छता व सफाई, बगीच्या विकसन व देखभाल सेवेस कार्योत्तर मुदतवाढ देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा २०२०/ प्र. क्र.१५३/आ ३अ**
गो.ते.रुग्णालय आवार, दहावा मजला, संकुल इमारत
मंत्रालय, मुंबई ४००००१
दिनांक : २६ ऑगस्ट, २०२०

**वाचा :- सहसंचालक,(अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय,मुंबई यांचे पत्र क्रमांक संआसे/भां.वि/आ.भ./ स्वच्छता सेवा/प्रस्ताव/न.क्र.००२ भाग २/ जा.क्र.०११/२०२० दिनांक १७.०६.२०२०**

**प्रस्तावना :-**

आरोग्य भवन इमारतीच्या स्वच्छता व सफाई, बगीच्या विकसन व देखभाल सेवा पुरविण्याकरीता शासकीय नोंदणीकृत संस्थांकडून जाहीर निविदा मागविण्यात आलेल्या होत्या. सदर निविदांच्या अनुषंगाने न्युनतम दर असलेल्या मे.परिवर्तन बेरोजगार सेवा सहकारी संस्था,मुंबई यांना आयुक्त, आरोग्य सेवा यांच्या दिनांक २३.०२.२०१८ व सहसंचालक, (खरेदी कक्ष) यांच्या दिनांक २९.१०.२०१८ च्या कार्यादेशाने व राज्य खरेदी समितीने दिलेल्या मंजुरीनुसार दिनांक १.०३.२०१८ ते २८.०२.२०१९ या कालावधीकरीता कार्यादेश देण्यात आले होते. तदनंतर दिनांक ६ जानेवारी, २०२० रोजीच्या केंद्रीय खरेदीच समितीच्या बैठकीमध्ये सदर संस्थेस आरोग्य भवन इमारतीच्या स्वच्छता व सफाई, बगीच्या विकसन व देखभाल सेवा पुरविण्याकरीता माहे मार्च,२०१९ ते माहे मार्च, २०२० या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात आली होती. मे. परिवर्तन बेरोजगार सहकारी संस्था यांना माहे मार्च,२०१८ ते माहे, मार्च, २०२० या कालावधीकरीता कार्योत्तर मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होता. यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

मे. परिवर्तन बेरोजगार सेवा सहकारी संस्था मर्यादित यांच्याकडून पुरविण्यात आलेल्या आरोग्य भवन इमारतीच्या स्वच्छता व सफाई, बगीच्या विकसन व देखभाल सेवेस माहे मार्च,२०१८ ते माहे मार्च, २०२० या कालावधीकरीता कार्योत्तर मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. उपरोक्त आरोग्य भवन इमारतीच्या स्वच्छता व सफाई, बगीच्या विकसन व देखभाल सेवे करीता होणारा खर्च "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,०६- सार्वजनिक आरोग्य, (०१) (०९)

-म.आ.से.वि.प्र. अंतर्गत ग्रामीण /कुटीर रुग्णालयाचे उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन (२२१०४६२४) ,१३- कार्यालयीन खर्च " या लेखाशीर्षा अंतर्गत सन २०२०-२०२१ मधील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७०८१४५१३६७९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2020.08.26 17:29:03 +05'30'

**( रो.दि.कदम-पाटील )**
अवर सचिव , महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल ( लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा - १ , मुंबई
४. सहसंचालक,(अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय,मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
७. वित्त विभाग (विनियम कार्यासन), मंत्रालय, मुंबई
८. अवर सचिव (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
९. निवड नस्ती (आरोग्य ३अ)